# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०६/ई-१०**

पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२

**दिनांक : २३ मे, २०२२**

वाचा - सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१६ / प्र.क्र.५०९/कार्या.१२, दि.१५/०५/२०१९

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५/०५/२०१९ च्या शासन निर्णयान्वये शासकीय कर्मचाऱ्याच्या विनंतीनुसार संवर्गाअंतर्गत एका नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या आस्थापनेवरुन दुसऱ्या नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या आस्थापनेवर कायमस्वरुपी समावेशन करण्याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे.

सदर धोरण निश्चित करतांना बदली अधिनियमानुसार गट-क मधील शासकीय कर्मचाऱ्याची ज्येष्ठतायादी ज्या स्तरावर ठेवली जाते त्या जिल्हास्तर, महसूल विभाग स्तर, राज्यस्तर या तीन स्तराचा विचार करुन, सदर शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ (२) मध्ये एकाच जिल्ह्यामधील एका नियुक्ती प्राधिकाऱ्याकडून त्याच जिल्ह्यातील दुसऱ्या नियुक्ती प्राधिकाऱ्याकडे कायमस्वरुपी समावेशन करता येणार नाही, असे स्पष्ट करण्यात आले होते. तथापि, गट क मधील “तलाठी” या संवर्गाचे नियुक्ती प्राधिकारी हे उपविभागीय अधिकारी असल्याने, सदर संवर्गाची ज्येष्ठतायादी ही जिल्हास्तरापेक्षा खालच्या स्तरावर म्हणजे उपविभागीय स्तरावर ठेवली जाते. त्यामुळे दि.१५/०५/२०१९ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ (२) नुसार तलाठी संवर्गातील कर्मचाऱ्यांचे त्यांच्या विनंती वरुन जिल्हांतर्गत एका उपविभागातून दुसऱ्या उपविभागात कायमस्वरुपी समावेशन करता येत नव्हते. सदर तांत्रिक अडचण विचारात घेता, दि.१५/०५/२०१९ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ (२) मधील अट “तलाठी” गट क या संवर्गाकरीता शिथील करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद बाब विचारात घेता, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.१५/०५/२०१९ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.६ (२) येथे नमूद अट केवळ “तलाठी गट-(क)”

संवर्गाकरिता शिथील करुन एका उपविभाग स्तरावरील नियुक्ती प्राधिकाऱ्याकडून दुसऱ्या उपविभाग स्तरावरील नियुक्ती प्राधिकाऱ्याकडे कायमस्वरुपी समावेशन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. मात्र, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१५/०५/२०१९ च्या शासन निर्णयातील इतर सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१३१३/का.१२/२०२१ दि.२१/१२/२०२१ व क्र.१००/का.१२/२०२२ दि.०९/०२/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०५२३१६५७०९४६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY
BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2022.05.23 17:00:11 +05'30'

**( संजय बनकर )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

(१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३२.
(२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
(३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
(४) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
(५) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई.
(६) सर्व मा. संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
(७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
(८) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
(९) सर्व मंत्रालयीन विभाग.
(१०) सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
(११) सर्व विभागीय आयुक्त.
(१२) सर्व जिल्हाधिकारी .
(१३) सर्व उपविभागीय अधिकारी.
(१४) कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
(१५) निवडनस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.